**अर्थसंकल्पीय अनुदान सन २०१०-२०११**

३६०४ - स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे. २००, इतर संकीर्ण नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे (०१)(०५) यात्रा कराऐवजी ग्राम पंचायतींना सहाय्य.

(३६०४०३४३) (दत्तमत ) (मागणी क्र. एल -५)

महाराष्ट्र शासन,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र. बीजीटी २६१०/प्र.क्र.७९ /पंरा-४
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक - ०३ मार्च, २०११.

संदर्भ:- शासन निर्णय, समक्रमांक दि. २७ एप्रिल, २०१० व दिनांक १२ ऑक्टोबर, २०१०

**शासन निर्णय :-**

यात्रा कराऐवजी ग्राम पंचायतींना आर्थिक सहाय्य देण्यासाठी सन २०१०-२०११ या वित्तीय वर्षासाठी उपरोक्त लेखाशिर्षातर्गत एकूण रक्कम रु. १९,८९,०००/- (रुपये एकोणीस लाख एकोणनव्वद हजार फक्त ) एवढी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे.

२. वरील तरतूदीपैकी संदर्भीय शासन निर्णय दिनांक २७ एप्रिल, २०१० अन्वये यात्राकराऐवजी ग्रामपंचायतींना सहाय्य (३६०४०३४३) देण्याकरिता रक्कम रुपये ४,६८,०००/- (रुपये चार लक्ष अडूसष्ट हजार फक्त) व संदर्भीय शासन निर्णय दिनांक १२ ऑक्टोबर, २०१० अन्वये रु.७,६१,०००/- ( रुपये सात लक्ष एकसष्ट हजार फक्त ) असे एकूण रु.१२,२९,०००/- ( रुपये बारा लक्ष एकोणतीस हजार फक्त ) संबधित विभागीय आयुक्त यांना वितरित करण्यात आली आहे. उर्वरित अनुदान या शासन निर्णयाद्वारे यात्राकराऐवजी ग्रामपंचायतींना सहाय्य (३६०४०३४३) देण्याकरिता रक्कम रुपये रु. ७,६०,०००/-(रुपये सात लक्ष साठ हजार फक्त) या शासन निर्णयातील खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे (रकाना क्र. ३) संबंधित विभागीय आयुक्त यांना वितरीत करण्यात येत आहे.

(रुपये हजारात )

| अ. क्र. | विभागाचे नाव | या शासन निर्णयान्वये मंजूर अनुदान (रुपये अंकी) (रुपये हजारात) | (रुपये अक्षरी) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | कोकण | ११.०७ | (रुपये अकरा हजार सत्तर फक्त) |
| २ | नाशिक | २१५.५३ | (रुपये दोन लक्ष पंधरा हजार पाचशे तीस फक्त) |
| ३ | पुणे | ३७२.५३ | (रुपये तीन लक्ष बाहत्तर हजार पाचशे तीस फक्त) |
| ४ | नागपूर | १६०.८७ | (रुपये एक लक्ष साठ हजार आठशे सत्तर फक्त) |
| | **एकूण** | **७,६०.००** | **(रुपये सात लक्ष साठ हजार फक्त)** |

३.    या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यांत आलेले अनुदान शासन निर्णय ग्राम विकास विभाग क्र. व्हीपीएम १३७८/१२७७/सीआर १४४/२३-अ, दिनांक ५.५.८१ अन्वये विहित केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहील.

४.    मंजूर करण्यांत आलेली अनुदानाची रक्कम विभागीय आयुक्तांनी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचेकडे वितरित करावी आणि वितरण आदेशाच्या प्रती शासनाकडे पाठवाव्यात. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी निर्णयात मंजूर केलेल्या तरतुदीपेक्षा जादा खर्च होणार नाही. याबाबत दक्षता घ्यावी.

५.    खर्चाचा मेळ घालण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी खर्चाची विवरणपत्रे विभागीय आयुक्तांना पाठवावीत. विभागीय आयुक्तांनी त्या खर्चाचे महालेखापाल, महाराष्ट्र १ व २ मुंबई / नागपूर या कार्यालयाशी ताळमेळाचे काम करावे व त्याबाबतचा अहवाल शासनाकडे पाठवावा.

६.    यासाठी होणारा खर्च ३६०४- स्थानिक संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसान भरपाई वअभिहस्तांकित रकमा देणे २००- इतर संकीर्ण नुकसान भरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे (०१) (०५) यात्रा कराऐवजी ग्रामपंचायतींना सहाय्य (३६०४०३४३) (दत्तमत) ( योजनेत्तर) ( मागणी क्र. एल-५ ) योजनेत्तर या लेखाशिर्षाखाली टाकण्यांत यावा व तो उपरोक्त लेखाशिर्षाखाली सन २०१०-२०११ या वित्तीय वर्षासाठी मंजूर केलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यांत यावा. तसेच वितरित निधीच्या खर्चाचा तपशील दिनांक ३० मार्च, २०११ पर्यन्त शासनास सादर करावा.

७.    हा शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र. ५६/व्यय-१५, दिनांक ७.२.२०११ व अनौपचारिक संदर्भ क्र. १६४/११/अर्थ-१७, दिनांक १८.२.२०११ अन्वये दिलेल्या मंजूरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८.    हा शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणकीय संकेतांक २०११०३०११७२४५१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

( म. सो. खंडारे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) विभागीय आयुक्त (सर्व)
२) जिल्हाधिकारी (सर्व )
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
४) सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष
५) महालेखापाल, महाराष्ट्र -१ , मुंबई (लेखापरिक्षा ) ( ५ जादा प्रतीसह )

६) महालेखापाल , महाराष्ट्र -१, मुंबई ( लेखा व अनुज्ञेयता )( ५ जादा प्रतीसह )

७) महालेखापाल , महाराष्ट्र -२, नागपूर (लेखा परिक्षा ) ( ५ जादा प्रतीसह)

८) महालेखापाल , महाराष्ट्र -२, नागपूर ( लेखा व अनुज्ञेयता ) ( ५ जादा प्रतीसह )

८) उप मुख्यलेखापरिक्षा,स्थानिकनिधीलेखा,कोकण(वाशी /पुणे/ नाशिक/ अमरावती/ औरंगाबाद/ नागपूर )

९) लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई

१०) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी , नवी मुंबई

११) निवासी लेखा अधिकारी, लेखा व अधिदान कार्यालय, मुंबई

१२) वित्त विभाग, (व्यय -१५) व (अर्थसंकल्प -१६)

१३) कार्यासन अधिकारी , ग्राम विकास व जलसंधारण विभाग ( वित्त -१, वित्त-७,वित्त-८ )

१४) निवड नस्ती (का.क्र.पंरा-४) ग्राम विकास व जलसंधारण विभाग